यशवंत पंचायत राज अभियान सन २०१६-१७
राज्यातील अत्युत्कृष्ट जिल्हा परिषदा, पंचायत
समित्यांना पुरस्कार योजनेसाठी निधी वितरण

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः झेडपीए-२०१६/प्र.क्र.१५५ /पंरा-१.

बाधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४००००१.
तारीख: १ मार्च, २०१७

वाचा -

**१) वित्त विभाग परिपत्रक क्रमांकः क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२० एप्रिल, २०१६**

**२) शासन निर्णय क्रमांकः झेडपीए-२०१६/प्र.क्र.१२३/पंरा-१, दि.१४ डिसेंबर, २०१६.**

शासन निर्णय -

ग्रामीण महाराष्ट्राच्या विकासामध्ये पंचायत राज संस्थांचे योगदान उल्लेखनीय आहे. राज्यामधील विकासाच्या सर्व योजना पंचायत राज संस्थामार्फत राबविल्या जातात. त्यामुळे पंचायत राज संस्थांना त्यांनी केलेल्या कामगिरीनुसार प्रोत्साहित करणे आवश्यक आहे. यासाठी राज्यातील पंचायत राज संस्थांचे व्यवस्थापन व विकास कार्यात अत्युत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या आणि ग्रामपंचायतींसाठी सन २००५-०६ या आर्थिक वर्षापासून विभागस्तरावर व राज्यस्तरावर “यशवंत पंचायत राज अभियान” ही अभिनव पुरस्कार योजना सुरु करण्यात आली आहे. या विभागामार्फत राज्यातील ग्रामपंचायतींसाठी “स्मार्ट ग्राम व्हिलेज” ही योजना नव्याने राबविण्यात येत असल्याने “यशवंत पंचायत राज अभियान” या योजनेमध्ये ग्रामपंचायती समाविष्ट न करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या योजनेअंतर्गत सन २०१६-१७ या चालू वित्तीय वर्षात रु.२.९१ कोटी (रुपये दोन कोटी एक्याण्णव लक्ष फक्त) इतकी रक्कम अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.

या वर्षी “यशवंत पंचायत राज अभियान” हा कार्यक्रम माहे मार्च, २०१७ मध्ये आयोजित करण्यात येणार आहे. या कार्यक्रमाचा खर्च भागविण्यासाठी सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात रु.२.९१ कोटी (रुपये दोन कोटी एक्याण्णव लक्ष फक्त) इतकी अर्थसंकल्पित करण्यात आलेली रक्कम या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत आहे.

सदरचा होणारा खर्च मागणी क्रमांक एल-३, २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १०१-पंचायती राज, ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०४) विशेष कार्यक्रम व ग्राम अभियान कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यामध्ये उत्कृष्ट काम केल्याबद्दल जिल्हा परिषदांना व पंचायत समित्या व ग्रामपंचायती यांना प्रोत्साहनपर अनुदान (संकेतांक २५१५ ००६२) (योजनेत्तर) लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ च्या मंजूर तरतूदीमधून करण्यात यावा.

उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक १४ डिसेंबर, २०१६ अन्वये अर्थसंकल्पित करण्यात आलेली रु. २.९१ कोटी रक्कम खर्च करण्यास विभागीय आयुक्त कोकण, कोकण भवन, नवी मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्याअनुषंगाने सदर निधी त्यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. सदर निधी खर्च झाल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची जबाबदारी तसेच सदर निधीवर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त कोकण, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांची राहील.

प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दिनांक २० एप्रिल, २०१६ रोजीच्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२८११५३१०३४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anandrao V Warkade

Digitally signed by Anandrao V Warkade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=be785b82f3066dbcbcb199e71ddca64300cdabc50757ce728288ea4a9d87f0c7, cn=Anandrao V Warkade
Date: 2017.03.01 15:29:39 +05'30'

**आ. वि. वरकडे**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
२. अप्पर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, नवी मुंबई.
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (कार्यासन अर्थ-३, अर्थ-१७, व्यय-१५ व अर्थोपाय शाखा), मंत्रालय, मुंबई
९. ग्राम विकास व जलसंधारा विभाग (कार्यासन क्र.वित्त-१, वित्त-४, वित्त-७, वित्त-८, पंरा-४ व समन्वय कक्ष, बांधकाम भवन, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१
१०. निवडनस्ती (कार्यासन पंरा-१)